
हेन्री डेव्हिड थोरो
निसर्गाचा रहिवासी
लेखक : कॅथरीन रीफ
रेखाटनं : लॅरी रेमंड
मराठी अनुवाद : नीलांबरी



*"निसर्गाच्या सान्निध्यात कितीही रहा. ते अपुरंच पडतं."*

## प्रकरण १ : एक योग्य नर्सरी

घरातल्या कोलाहलापासून दूर असलेला एक चिमुरडा एकटाच आपल्या घरातल्या छतावरच्या खोलीतल्या खिडकीतून बाहेरचं विश्व न्याहाळत होता. घरामागच्या अंगणातले पक्षी इकडे तिकडे फिरत आपापली घरटी बांधण्यात मश्गुल होते. वसंत ऋतूचं आगमन झालेलं होतं आणि हे निळे-काळे मोहक पक्षी दक्षिण अमेरिकेतल्या उन्हाळ्यातून मॅसॅच्युसेटसमध्ये परतले होते.

आठवड्याचा दुसरा कोणाही दिवस असता तर हा लहान मुलगा – हेन्री डेव्हिड थोरो घराबाहेर या मार्टिन पक्ष्यांसारखाच विहरत असता. पण रविवारी त्याला घराबाहेर खेळायची परवानगी नव्हती.

तो १८२० सालातला काळ होता. रविवार म्हणजे सब्बाथचा दिवस फक्त देवाची प्रार्थना आणि मनन यासाठी राखून ठेवलेला होता. न्यू इंग्लंड विभागातल्या रहिवाशांसाठी हा एकच सुट्टीचा आणि आराम करण्याचा दिवस होता. परत आठवड्याभरात त्यांना आपली शेती, व्यवसाय किंवा घरकामाला जुंपावंच लागणार होतं. रविवारी मुलांनाही सब्बाथ पाळावा लागत होता आणि पुस्तकं / खेळणी अशा गोष्टींपासून लांब रहावं लागत होतं.

त्या दिवशी दुपारी खिडकीतून बाहेरचं दृश्य न्याहाळताना हेन्रीला एक उडणारा बहिरी ससाणा दिसला. त्याचे घारे डोळे आणि गहिरी नजर ससाण्याच्या उडण्याचा पाठलाग करायला लागली. आपण घरात कैदेत आहोत हे हेन्री क्षणभर विसरला. त्याचं मनही त्या ससाण्यासारखंच आकाशात उडायला लागलं. ससाणा मॅसॅच्युसेटसमधल्या काँकॉर्डच्या उंच इमारतींवर घिरट्या घालत होता. तिथले सगळे उद्योगधंदे आणि दुकानं रविवारी बंद होती. शेतांवर आणि भोवतालच्या इमारतींच्या दगडी भिंतींवर ससाण्याची सावली स्पष्ट दिसत होती.





दुकानांच्या पुढे शेती आणि त्यानंतर विस्तीर्ण जंगल होतं. त्यापुढे काँकॉर्ड नदीभोवतीचे किनारे हिरवाईनं लपेटलेले होते. हेन्री कायम नदीकिनार्‍यावर उभा राहून वार्‍यानं पाण्यावर उठणारे तरंग तासनतास बघत बसायचा. काही वर्षांनंतर त्यानं “पाण्याच्या तळाशी असलेले तण वार्‍याच्या झुळकीनं किंचित लवायचे. झाडांच्या खोडाच्या साली, छोट्या झुडपांच्या आणि कधी झाडांच्या फांद्या पाण्याबरोबर हलकेच तरंगत दूर निघून जायच्या.. मला ते पहायला भारी आवडायचं” असं लिहून ठेवलं होतं.

कॉंकॉर्ड शहराभोवती अनेक तलाव होते. खरं तर १०००० वर्षांपूर्वी तिथे विशाल हिमनग होते. ते बर्फाच्या सरकत्या भिंतींसारखे भासत. तो बर्फ वितळून तयार झालेल्या त्या तलावांमध्ये पडून चमचमणारे सूर्यकिरण हेन्रीला भलतेच प्रिय होते. "पृथ्वीवर पाचू पसरल्याचा भास व्हायचा" अशी त्यानं या दृश्यांची वर्णनं केली आहेत. कधीकधी त्याला ते प्रकाशाचे तलाव वाटायचे.

हेन्रीचा सर्वात लाडका होता.. वॉल्डनचा तलाव..! लहान असताना त्या सुनसान जागेत वृक्षांच्या घनदाट छायेत उभा राहून कित्येक तास त्या तलावाकडे अनिमिष नेत्रांनी पहात रहायचा. तिथे त्याला कधीच एकटं वाटायचं नाही. उलट तिथे त्याला अभूतपूर्व शांत वाटायचं. तो स्वत: त्या परिसराचाच एक भाग आहे असं त्याला भासायचं. त्यावेळच्या अनुभवांबद्दल त्यानं "माझ्या अस्तित्वाला या जाणिवेची गरज होती" असं लिहिलं होतं. तलावाकाठचे पाईनचे उंच वृक्ष पाहून "माझ्या आत्म्याच्या उन्नतीसाठी सर्वात उपयोगी ठिकाणी मला लाभलंय असं मला वाटायचं" असंही त्यानं लिहिलं होतं.





जरा मोठा झाल्यानंतर हेन्री परत एकदा वॉल्डनच्या तलावाकाठी गेला होता. ४ जुलै १८४५ पासून ६ सप्टेंबर १८४७ पर्यंत दोन वर्षांपेक्षा जास्त काळ तो तिथे एक झोपडी बांधून राहिला होता.

हेन्री थोरो वॉल्डन तलावाकाठी एक शांत आणि साधंसुधं आयुष्य जगण्यासाठी गेला होता. धकाधकीत न गुंतलेलं आयुष्य त्याला जगायचं होतं. दैनंदिन कामांच्या रगाड्यात असताना आयुष्याचा जो अर्थ समजला नसेल तो त्या ठिकाणी समजेल अशी त्याला आशा होती.

आपल्या या अनुभवांवर आधारित त्यानं लिहिलेल्या “वॉल्डन” या पुस्तकामुळे अनेकजणांना आपल्या आयुष्याचा विचार करुन ते बदलायला मदत केली आहे. या पुस्तकामुळे लोकांना निसर्गाचं महत्व समजलं. पर्यावरणाचं जतन करण्याची आवश्यकता त्यांच्या लक्षात आली. काँकॉर्डमधल्या या लेखकानं जंगलातून सरपण, धातू आणि इतर वस्तू मिळवण्यापलीकडचं निसर्गाचं मोल लोकांनी जाणायला हवं हे समजावून सांगितलं. निसर्गात राहूनच मन:शांती मिळते आणि स्वत:लाही जाणून घेण्याची प्रेरणा मिळते हे थोरोचं मत होतं.

“निसर्ग जितका आपण आपल्यामध्ये मुरवून घेऊ तितकं कमीच असतं” असं थोरोनं लिहिलं होतं. उगवत्या आणि कालौघात नष्ट होत जाणाऱ्या वृक्षांचं जीवनचक्र, गरजणारे मेघ, संततधार या सगळ्यांबरोबर रहाताना त्याला घरातच राहिल्याचं सौख्य लाभायचं. शहरातल्या धावपळीच्या आयुष्यापासून दूर गेल्यानंतरच चिरकाल टिकणारं आयुष्यात काय आहे याचा शोध घेता येईल असं त्याचं मत होतं.

माणूस हा निसर्गाचाच एक अंश आहे असं थोरो मानायचा. “जंगलातले प्राणी, झाडं, झुडपं यांच्यासोबत साहचर्य असण्याची आवश्यकता आहे. लोकांनी काळजी घेतली नाही तर नैसर्गिक साधनसंपत्तीचा विनाश होईल” या इशारा थोरोनं आधीच देऊन ठेवला होता. एकदा नष्ट झालेली ही संपत्ती पुनरुज्जीवित करता येणार नाही. नदी, तलाव, हिरवीगार कुरण, पर्वतराजी, दऱ्याखोऱ्या, जंगल, झाडं हे सगळं विलोभनीय आहे. त्यांचं मोल रुपयापैशात करता येणार नाही असं थोरो म्हणायचा.

थोरोच्या या विचारांमुळे अनेकजण निसर्ग आणि पर्यावरणाचं रक्षण करण्यासाठी प्रेरित झाले. त्याच्या विचारांनी अनेक लेखक आणि कलाकार यांना निसर्ग हा विषय घेऊन कला सादर करायला प्रोत्साहन मिळालं. या लोकांमुळे इतर अनेकजणही निसर्गप्रेम या विषयाकडे आकर्षित झाले.

आपण एका मौल्यवान गोष्टीचं रक्षण करत आहोत यावर सर्व निसर्गप्रेमींचा विश्वास आहे. एकदा ही वस्तू हरवली तर परत मिळणार नाही हे त्यांना ठाऊक आहे. यातल्या बहुतेक सगळ्यांना हेन्री डेव्हिड थोरोची पुस्तकं वाचूनच हे ज्ञान प्राप्त झालं आहे.

*“शाळेत जायचं नसेल तेव्हा मी खूप आनंदात असायचो.”*

## प्रकरण २ : एक अजब काठी

जॉन आणि सिंथिया थोरो यांच्या तिसर्‍या अपत्याचा जन्म १२ जुलै १८१७ रोजी झाला. त्या अपत्याच्या काकाच्या नावावरुन त्याचं नाव डेव्हिड ठेवण्यात आलं. पण सगळे जण त्याला त्याच्या मधल्या म्हणजे हेन्री या नावानंच बोलवायचे. हेन्रीच्या मोठ्या बहिणीचं नाव हेलेन, मोठ्या भावाचं नाव जॉन आणि धाकट्या बहिणीचं नाव सोफिया होतं.

हेन्री ज्या घरात वाढला ते घर माणसांनी भरलेलं होतं. घरात कायम काहीतरी गडबडगोंधळ चालू असायचा. त्याच्या कुटुंबात अनेक विषयांवर मोकळेपणानं चर्चा व्हायच्या. रात्रीच्या निवांत वेळी धर्म किंवा राजकारण हेच चर्चेचे विषय असायचे.

मिळकत वाढवण्यासाठी त्यांनी काही भाडेकरु आणि नातेवाईक यांनाही आश्रय दिला होता. त्यामुळे घरातल्या लोकांची संख्या अजूनच वाढली. याच पाहुण्यांमध्ये हेन्रीचा लाडका काका चार्ल्स डनबर हादेखील होता. चार्ल्सकाकांच्या काही विचित्र सवयींची हेन्रीला गंमतच वाटायची. उदाहरणार्थ, रविवार तळघरात घालवणं किंवा दाढी करता करताच झोपी जाणं. चार्ल्सकाका जो पोशाख घालायचे तो न्यू इंग्लंडच्या इतर रहिवाशांपेक्षा खूप वेगळा होता. सलगपणे एकच एक काम करण्यात त्यांना काडीचा रस नव्हता. त्यामुळे ते काही दिवस थोरो कुटुंबात रहायचे. काही दिवसांनंतर तिथून निघून जायचे. परत यायचे. कॉँकॉर्डमध्ये काही दिवस घालवल्यानंतर ते कोणालाही न सांगता व्हर्मॉँटमध्ये गवताची कापणी करायला किंवा मेनच्या समुद्रकिनार्‍यावर फिरायला निघून जायचे.

घरदार सांभाळण्याची जबाबदारी सिंथिया थोरोवर होती. एका अनाम उर्जेनं सतत कष्ट करुन सहजपणे ती कुटुंबातल्या सगळ्यांना खायला घालायची. “घरात साधे ब्रेडचे तुकडे असले तरी ते छानपैकी सजवून ती सगळ्यांना वाढायची” असं एक मित्र म्हणायचा.

थोरो कुटुंबात पैपैशांचा हिशोब काटेकोरपणे ठेवला जात असला तरी ते आपल्याहून गरीब लोकांना मदत करायचे. ख्रिसमस किंवा थँक्सगिव्हिंग सारख्या सणांना सिंथिया आणि जॉन आपल्या गरीब शेजार्‍यांना घरी जेवायला बोलावत असत. सिंथियाची सहानुभूती केवळ कॉँकॉर्डमधल्या गरीब शेजार्‍यांपुरती मर्यादित नव्हती. वंश किंवा राष्ट्रवाद यांच्या जोरावर कोणत्याही प्रकारचा भेदभाव तिला अमान्य होता. सर्व माणसं समान आहेत असं तिचं मत होतं. त्यामुळे गुलामगिरीविरुध्द आपली मतं ती जाहीरपणे मांडत असे. कॉँकॉर्डमध्ये तिनं गुलामगिरी निर्मूलनाच्या महिला सभेची स्थापना केली होती.

जॉन थोरो विचारी, प्रामाणिक आणि सौहार्दपूर्ण व्यक्तिमत्वाचा होता. त्याचा लाकडी पेन्सिली तयार करायचा व्यवसाय होता. अशा पेन्सिली तेव्हा नुकत्याच बाजारात आल्या होत्या. काम संपल्यावर पुस्तक वाचणं किंवा संगीत ऐकणं त्याला खूप आवडायचं. आपल्या आवडीची पुस्तकं तो हेन्रीलाही वाचायला देत असे. वडिलांकडून हेन्री बासरी वाजवायलाही शिकला होता.

थोरो दांपत्याला निसर्गात रममाण व्हायला आवडायचं आणि निसर्गावर प्रेम करायला त्यांनी आपल्या मुलांनाही शिकवलं. काँकॉर्डच्या आसपास अनेक वृक्ष आणि नद्या असल्यामुळे तसं करणं सोपं होतं. कुटुंबातले सगळेजण मिळून जंगलात भटकंती करायला जायचे. तिथेच चूल पेटवून चवदार सूप बनवायचे. सिंथिया मुलांना घराबाहेर नेऊन पक्ष्यांचे कर्णमधुर आवाज ऐकवायची.

पण निसर्गाचा अभ्यास सोडूनही काँकॉर्डमध्ये शिकण्यासारखं खूप काही होतं. केवळ दोन हजारांची वस्ती असलेल्या या गावानं अमेरिकेच्या इतिहासात गौरवाचं स्थान मिळवलं होतं.

क्रांतीची बीजं इथेच रोवली गेली होती. त्या युध्दाच्या तोफांची गर्जना जगभर ऐकू गेली होती असं म्हणलं जायचं.

तिथे रहाणारे नगरजन आजही याबद्दल अभिमान बाळगून होते. जिल्ह्याचं मुख्य न्यायालय काँकॉर्डमध्येच होतं. बोस्टनमध्ये येणार्‍या-जाणार्‍या कित्येक गाड्या रोज इथे थांबायच्या. प्रवासी तिथल्या हॉटेल्समध्ये रहायचे. बाजारात फेरफटका मारुन खरेदी करायचे. लहान मुलांना काँकॉर्डमधल्या नदीतलं नौकानयन बघताना मजा वाटायची. त्या नावेचे नावाडी अनेकदा मुलांना नावेत बोलवून जलजीवनाबद्दल माहिती द्यायचे.





अर्थात काँकॉर्डच्या मुलांना शिकवण्याची जबाबदारी केवळ नावाड्यांवर नव्हती. शाळेत लहान मुलांनी गंभीरपणे वागावं अशी अपेक्षा केली जात होती. “नीट बसावं, शिक्षक काय सांगतील ते लक्ष देऊन दिवसभर ऐकावं” अशा त्यांच्या अपेक्षा असायच्या.

गावातल्या सार्वजनिक शाळेत सर्व इयत्तांमधले विद्यार्थी एकाच वर्गात बसायचे. हेत्री आणि त्याचे काही मित्र बायबल किंवा शेक्सपिअरची नाटकं यातले लांबलचक उतारे मुखोद्गत करायचे. ज्या मुलामुलींचं शिकण्याकडे लक्ष नसेल त्यांना शिक्षक चक्क छडीनं मार द्यायचे.

११ वर्षांचा झाल्यावर हेत्री आणि त्याचा भाऊ यांनी काँकॉर्ड अ‍ॅकेडमी या जवळच्याच एका शाळेत प्रवेश घेतला. हेत्री अभ्यासात हुशार होता. निसर्गाची आवड असल्यानं त्यानं तेव्हाच “द सीझन्स – ऋतू” नावाचं एक पुस्तक लिहिलं. बदलत्या ऋतूत सृष्टीत घडणार्‍या दृकश्राव्य बदलांचं वर्णन त्यात केलं होतं.

वसंत ऋतूचं वर्णन करताना हेत्रीनं “जमीन हिरव्यागार कुरणांनी तजेलदार दिसते. दक्षिणेकडे स्थलांतर करुन गेलेले पक्षी परत येतात आणि पहाटे आपल्या किलबिलीनं वातावरण भारुन टाकतात” असं लिहिलं होतं. झाडाझुडपं टवटवीत पानाफुलांनी भरुन जातात आणि फळं पक्व व्हायला लागतात त्यामुळे त्यानं ग्रीष्म ऋतूला त्यानं वर्षातला सर्वात देखणा ऋतू म्हणलं होतं.

“पानगळीच्या काळात शेतकरी येणार्‍या थंडीची तयारी करतात. बाजारात खूप सारी फळं दिसायला लागतात. पक्षीदेखील उबदार हवेच्या प्रदेशांकपे उडायला लागतात. आता थंडी येणार हे त्यांना ठाऊक असतं. शिशिरात यातलं काहीच दिसत नाही.

पक्ष्यांचं प्रसन्न करणारं कूजन थांबलेलं असतं. बर्फावरुन जाणार्‍या ढकलगाड्यांच्या घंटा सोडल्या तर काहीसुध्दा ऐकू येत नाही” असं त्यानं लिहिलं होतं.

निसर्गातले हे बदल टिपण्याची संधी हेत्रीला अनेकवेळा मिळायची. त्याला जंगलांमध्ये एकटं भटकायला आवडायचं. बर्फावरुन स्केटिंग करणं, रेड इंडियन लोकांचे जुने बाण किंवा इतर हत्यारं जंगलात फिरताना शोधणं हे त्याला प्रिय होतं. वयस्कर झाल्यावर त्यानं याबद्दल “एकदा मला शाळेत न पाठवता जवळच्या टेकडीवरुन रात्रीच्या जेवणासाठी फळं आणायला सांगितली तेव्हा मी किती खुश झालो होतो ते मला चांगलंच आठवतं” असं लिहून ठेवलं होतं.

जरा मोठा झाल्यावर मित्रांबरोबर खेळण्याफिरण्यापेक्षा निसर्गात रमायला आपल्याला जास्त आवडतं हे हेत्रीच्या लक्षात आलं. त्याला सहजी मित्र जोडता येत नसतं. जॉन या त्याच्या भावाला मात्र ते चांगलंच जमायचं. मित्र हेत्रीला जजसाहेब म्हणायचे. त्याचा चेहरा नेहमी जजसारखा गंभीर असायचा. मित्रांनी त्याला दिलेलं दुसरं नाव एक विचित्र छडी (odd stick) असं होतं.

पण काँकॉर्डमधले युवक हेत्रीच्या निसर्गप्रेमाची प्रशंसा करायचे. पाणी, चिखल, माती यात हात घालायला त्याला काहीच वाटत नाही याचंही त्यांना कौतुक वाटायचं.

स्वत:च्या हातांनी सगळी कामं करणारा ही हेत्रीची अजून एक ओळख होती. ती कामं त्याला अवगत होती. त्याला लाकडाच्या तुकडा किंवा बांबूची नळी घासून शिट्टी करता यायची. लाकडाचे पशु पक्षी तयार करता यायचे. हातोडे आणि खिळे याबाबतीतलं त्याचं कौशल्य पाहून घरातल्या सर्वजणांना हा मोठेपणी चांगला सुतार बनेल असंच वाटायचं.

१८३३च्या साली १६ वर्षांचा असताना ग्रीष्म ऋतूमध्ये हेन्रीनं रोव्हर नावाची एक छोटी नाव बनवली होती. उन्हाळ्यातल्या शांत दुपारी या नावेत पडून तो वॉल्डन तलावात तरंगत असायचा. वरती निळंभोर आकाश दिसायचं. कॉंकॉर्ड शहरातले लोक हे पाहून त्याला आळशी हेन्री म्हणत.



पण विचारात गढलेल्या हेन्रीला आपण वेळ वाया घालवतोय असं अजिबात वाटत नव्हतं. अमेरिकेतले मूळ रहिवासी, बाहेरुन आलेले आणि इथे स्थायिक झालेले लोक, या तलावात येऊन गेलेले आणि तलाव अजिबात गढूळ न करता परत गेलेले लोक अशा विषयांवर त्याच्या डोक्यात विचारचक्र चालू असायचं. शेकडो वर्षांपासून या लोकांनी या तलावाचं पाणी पिऊन आपली तहान भागवली असेल, याच्या सौंदर्यानं तृप्त झाले असतील आणि पुढे निघून गेले असतील. पण हे पाणी आधीसारखंच मधुर आणि तेजस्वी आहे. असे विचार त्याच्या मनात यायचे.

*"शिक्षण हा मी एक आनंददायक अनुभव बनवेन..!"*

## प्रकरण ३ : निसर्गाचा पुत्र

"सुतार झालेला हेन्री" असं भविष्यातलं चित्र पहायला सिंथिया अजिबातच तयार नव्हती. तिच्या मनात मुलाबद्दल दुसरीच स्वप्नं होती. ती त्याला कॉलेजमध्ये पाठवणार होती. यामुळे ३० ऑगस्ट १८३३ रोजी हेन्री घरापासून १५ मैलांवर केंब्रिज-मॅसॅच्युसेटसला गेला. तिथे तो हार्वर्ड विद्यापीठात दाखल झाला.

हार्वर्डमध्ये तेव्हा २५० विद्यार्थी होते. ते सर्वजण आठवड्यातून सहा दिवस खूप अभ्यास करायचे. सकाळी अगदी पहाटे कॉलेजमधल्या चर्चमध्ये प्रार्थना असायची. त्यानंतर दिवसभर ते लॅटिन, ग्रीक, गणित, फ्रेंच इ. विषय शिकायचे.

हार्वर्डमधल्या विद्यार्थ्यांबरोबर हेन्रीची मैत्री जुळली नाही. काही विद्यार्थ्यांना तो उदास वाटायचा. इतरांना तो संवेदनाशून्य वाटायचा. हेन्रीला मात्र आपल्या एकटेपणातच आनंद वाटत होता. तो चार्ल्स नदीच्या तीरावर भटकायचा किंवा जवळच्या शेतांमध्ये फिरायला जायचा. कॉलेजमधल्या एका वर्गमित्रानंच त्याला "निसर्गाचा पुत्र" असं नाव दिलं होतं.

लवकरच हेन्रीला विद्यापीठातल्या ग्रंथालयानं आकर्षित केलं. तिथे ५० हजारांपेक्षा जास्त पुस्तकं होती. एका जिज्ञासू विद्यार्थ्यासारखा हेन्री तिथे कित्येक तास वाचत बसायचा. त्याला आवडतील ते परिच्छेद वहीत लिहून ठेवायचा.



काँकॉर्डचा रहिवासी असलेल्या राल्फ वाल्डो इमर्सन यानं लिहिलेलं “नेचर” हे त्याचं लाडकं पुस्तक होतं. त्या छोट्याशा पुस्तकात निसर्गाबद्दल मांडलेल्या भावना हेन्रीला आपल्या मनातल्याच भावना वाटत होत्या. “माणसाच्या मनावर पहिल्यांदा निसर्गाचाच प्रभाव पडतो. तेच योग्य आहे” असं इमर्सननं लिहिलं होतं. “निसर्गाला आदि आणि अंत नाही..” असंही त्यानं पुढे म्हणलं होतं. फळं फुलं आणि पशुपक्षी यांनी बहरलेली हे सृष्टीवैभव देवानं निर्माण केलं आहे. निसर्गामुळे माणूस अध्यात्मिक उन्नतीच्या दिशेला प्रवास करतो असं इमर्सनचं मत होतं.

दैनंदिन जीवनातल्या विवंचनांपासून दूर निसर्गात रममाण झाल्यानंतर जगाकडे एका वेगळ्या दृष्टिकोनातून पहाता येतं. जग किती सुंदर आहे ते रोजच्या ताणतणावाच्या आयुष्यात आपण विसरतो. पण निसर्गात गेल्यानंतर ते जाणवतं. पहाटे दिसणारे सूर्यकिरण, लहान मुलांचं निरागस हास्य, ग्रीष्म किंवा वर्षाऋतूतलं सृष्टीवैभव या सर्वसाधारण गोष्टींमधलं सौंदर्य त्यानंतरच जाणवतं. सर्वसामान्य गोष्टी अद्‌भुत वाटायला लागतात.

यानंतरच्या काळात घडलेल्या विचित्र घटनांमुळे हेन्रीला आपलं शिक्षण पूर्ण करण्याआधीच हार्वर्ड विद्यापीठ सोडावं लागलं. १८३६ च्या वसंतऋतूत तो खूप आजारी पडला. अनेक महिने त्याला घरी रहावं लागलं. हेन्रीला नक्की कोणता आजार झाला होता त्याची इतिहासात नोंद नाही. पण बहुतेक तो विषमज्वर असावा. १८व्या शतकात फुफुसांवर आक्रमण करणार्‍या या संसर्गजन्य रोगानं अनेक बळी घेतले होते.

त्याच्या घरातल्या काहीजणांचा हेन्रीनं शिक्षण सोडून द्यावं असाच आग्रह होता. शिक्षणामुळे त्याची तब्येत बिघडत चालली आहे असं त्या सगळ्यांचं म्हणणं होतं. पण हेन्रीला मात्र हार्वर्डला जाऊन आपलं शिक्षण पूर्ण करायचं होतं. उन्हाळ्यात कॉंकॉर्डमध्ये विश्रांती घेतल्यावर त्याची तब्येत जरा सुधारली. पानगळीच्या ऋतूत तो परत हार्वर्डमध्ये दाखल झाला.

परीक्षेत खूप चांगले मार्क मिळाल्यामुळे १८३७ साली पदवीदान समारंभात हेन्रीला व्यासपीठावर बोलायला आमंत्रित केलं गेलं. न्यू इंग्लंडमधल्या इतर रहिवाशांपेक्षा त्याचे विचार एकदमच वेगळे होते हे त्याच्या व्याख्यानात प्रकर्षानं जाणवलं. “आपल्याभोवतालचं जग केवळ उपयुक्त असण्यापेक्षा खूप सुंदर आहे. निसर्गातल्या गोष्टींचा फक्त उपयोग करण्याचा विचार करण्यापेक्षा निसर्गसौंदर्याचा आस्वाद घेऊन आनंदात रहाणं जास्त महत्वाचं आहे” असं तो तेव्हा म्हणाला होता. आठवड्यात सहा दिवस काम करुन एकच दिवस विश्रांती घेणं हेन्रीला पसंत नव्हतं. ही व्यवस्था बदलायला हवी. फक्त सातव्या दिवशी कष्ट करुन माणसानं आपली कमाई करायला हवी. उरलेले सहा दिवस त्यानं सुट्टी घ्यावी असं हेन्रीचं मत होतं.

हेन्रीनं आपल्या वर्गमित्रांना “आत्म्याशी प्रामाणिक राहून स्वतंत्र आयुष्य जगावं” असं आवाहन केलं. संपत्तीची लालसा, हावरटपणा आणि स्वार्थीपणा यातून लोक निसर्गातली संसाधनं नष्ट करत चालले आहेत अशी त्याला भीती वाटत होती. आपल्या मित्रांनी संपत्ती साठवण्याच्या मागे लागू नये अशी त्यानं विनंती केली. यामुळे जमीन सतत फळाफुलांनी बहरलेली आणि हवा कायम शुध्द राहील असं त्याचं मत होतं.

शिक्षण संपल्यावर हेन्री आनंदात कॉंकॉर्डला परतला. आठवड्यात सहा रविवार असावेत असं त्याला वाटायचं. म्हणजे त्याला त्याच्या प्रिय निसर्गात वेळ घालवता आला असता. पण त्याला गुजराणही करायची होती. त्यासाठी तो कॉंकॉर्डच्या केंद्रीय विद्यालयात शिक्षकाच्या कामावर रुजू झाला. जिथे ९० मुलं दाटीवाटीनं एकाच वर्गात बसायची.



हेन्रीनं नोकरी सुरु करुन दोन आठवडेच झाले होते. तेव्हा शाळेच्या संचालक समितीतला एक सदस्य तो कसं शिकवतंय ते पहायला आले. त्यांनी हेन्रीला “मुलं नीट शिस्तशीर वागली नाहीत तर त्यांना सरळ चोप द्या” असं ठासून सांगितलं. याचा हेन्रीला रागच आला. त्यानं स्वत:वरचा ताबा सुटला आणि हेन्रीनं पाच दहा मुलांना अकारण चोप दिला. नंतर मात्र त्यानं ती नोकरीच सोडून दिली.

त्यानंतर त्यानं वहीत लिहिलं.. ”विद्यार्थी आणि शिक्षक या दोघांसाठी एक सुखद अनुभव होईल असं शिक्षण मी तयार करेन. त्यासाठी शिक्षकांनाही विद्यार्थ्यांबरोबर शिकावं लागेल”. आपल्या विद्यार्थ्यांकडूनही शिकू शकणाराच एक चांगला शिक्षक होऊ शकतो असं हेन्रीचं मत होतं.

अर्थात बऱ्याच लोकांना हेन्रीचे हे विचार पटत नव्हते. त्यांना हेन्री विक्षिप्त वाटायचा. त्यानं आपलं नाव डेव्हिड हेन्रीच्या ऐवजी हेन्री डेव्हिड केलं हेही लोकांना विचित्रच वाटत होतं. “देवानंच नाव दिलेलं असतं, ते बदलणं योग्य नाही” असं तेव्हा जनसामान्यांचं मत होतं. त्यामुळे तो जेव्हा डेव्हिड हेन्रीचा - हेन्री डेव्हिड झाला तेव्हा लोकांना त्याच्या विक्षिप्तपणाची खात्री पटली.

जेव्हा त्याला दुसरीकडे कुठेच शिक्षकाची नोकरी मिळाली नाही तेव्हा हेन्रीनं वडिलांच्या पेन्सिल बनवण्याच्या कारखान्यात काम सुरु केलं. तेव्हा अमेरिकेत पेन्सिलमधलं शिस सहज तुटायचं. हेन्रीनं त्याची गुणवत्ता सुधारायचा निश्चय केला.

त्यासाठी तो हार्वर्डच्या ग्रंथालयात गेला. “पेन्सिल” या विषयावर जेवढी पुस्तकं होती ती सगळी पुस्तकं त्यानं वाचली.

जर्मनीतले पेन्सिल बनवणारे कारखानदार पेन्सिलीत घातल्या जाणाऱ्या ग्रॅफाईटमध्ये एक विशिष्ट प्रकारची चिकणमाती मिसळत होते असं त्याच्या लक्षात आलं. त्यामुळे पेन्सिलीतलं शिस सहज तुटत नव्हतं. ती माती कुठे विकत मिळेल याचाही त्यानं शोध लावला. शिसाची जास्त चांगली भुकटी करणारं एक यंत्रही त्यानं तयार केलं. त्यामुळे पेन्सिलीतलं शिस जास्त मजबूत झालं.




हेन्रीनं केलेल्या या सुधारणांमुळे कुटुंबाच्या व्यवसायातला नफा चिक्कार वाढला. पण पेन्सिलीच्या कारखान्यात काम करायचा हेन्रीला कंटाळा होता. शिक्षकाचं काम मिळवण्यासाठी तो मेन (maine) या ठिकाणीही गेला. पण तिथेही त्याला नोकरी मिळालीच नाही.

कॉंकॉर्डमध्ये हेन्री “नेचर” या पुस्तकाचा लेखक इमर्सनबरोबर जास्तीत जास्त वेळ घालवायला लागला. इमर्सननं त्याला आपल्याकडची काही पुस्तकं वाचायला दिली. त्यामुळे हेन्रीला अजून काही साहित्यिक माहिती झाले. कॉंकॉर्डमधले अनेक लेखक आणि विचारवंत इमर्सनच्या घरी चर्चेसाठी येत असतं. त्यांच्याशीही हेन्रीची ओळख झाली.

इमर्सन आणि हेन्री नेहमीच वॉल्डनच्या तलावाकाठी फिरायला जात. त्यावेळी इमर्सनकडून हेन्रीला खूप काही शिकायला मिळालं. इमर्सनलाही हेन्रीबरोबर फिरायला आवडायचं. “हेन्रीला त्या जंगलाची तिथल्या पशुपक्ष्यांइतकीच चांगली जाण आहे. बर्फाळ वाटांमधल्यासुध्दा अनेक पायवाटा त्याला ठाऊक आहे. कोणतं जनावर तिथून नुकतंच गेलंय हे तो बिनचूक सांगू शकतो” असं इमर्सन नंतर सांगायचा.



इमर्सनच्या घरी जमणार्‍या लेखकांच्या गटाला “ट्रान्सेंडेंटलिस्ट” असं नाव होतं. त्या सगळ्यांचा एका वेगळ्या प्रकारच्या शिक्षणावर विश्वास होता. प्रत्येकजण काहीतरी ज्ञान घेऊनच जन्माला येतो. चांगलं आणि सत्य काय यांची पारख मनुष्याला जन्मजात असते असं या सर्वांचं ठाम मत होतं.
“ट्रान्सेंडेंटलिस्ट” विचाराच्या लोकांच्या मतानुसार, प्रत्येक माणसाच्या अंतरात्म्याचा एक आवाज असतो. तो आतला आवाज मुलांना ज्ञान मिळवून देतो. मुलांना आपल्या आतला हा आवाज सहज ऐकू येत असतो. जी माणसं साधंसुधं आणि निसर्गाशी तादात्म्य पावणारं आयुष्य जगतात त्यांनादेखील हा आतला आवाज ऐकू येतो.

मात्र जसजसं वय वाढत जातं, आयुष्यातली धावपळ वाढते, तसं या आतल्या आवाजाशी लोकांचं नातं तुटत जातं. प्रौढ लोकांनीही हा आतला आवाज परत एकदा लक्षपूर्वक ऐकावा असं आवाहन ट्रान्सेंडेंटलिस्टस करत असत. निसर्गात राहून रोजच्या काळज्या विसरण्याचा तो एक मार्ग आहे असं त्यांना वाटायचं.

ट्रान्सेंडेंटलिस्ट लोक आपल्याजवळ कायम एक डायरी बाळगत. मनातले विचार त्यात नोंदवून ठेवत. आतला आवाज काहीतरी सांगायला लागल्यानंतर डायरीत लिहायची इच्छा होणं हे त्यांच्यासाठी नैसर्गिकरीत्या घडत होतं. आपण कोण आहोत, कुठे चाललो आहोत, आयुष्यात कुठे पोचायचं आहे याबद्दल आणि स्वतःच्या अस्तित्वाबद्दल जाणीव स्पष्ट होण्यासाठी डायरीतलं लिखाण हे फक्त एक साधन होतं. याच डायरीतल्या लिखाणाचा काही भाग त्यांच्या पुस्तकांमध्ये डोकवायचा.



हेन्रीनंही डायरी लिहायचा आणि लेखक व्हायचा निर्धार केला. २२ ऑक्टोबर १८३७ रोजी वीस वर्षांचा असताना हेन्री डेव्हिड थोरोनं एक नवीन वही उघडली आणि “आजपासून मी डायरी लिहायला सुरुवात केली..” ही पहिली ओळ त्यात लिहिली.

*“मी कॉंकॉर्डच्या मातीचा बनलेलो नाही का?”*

## प्रकरण ४ : थोरो – एक शिक्षक

१५ सप्टेंबर १८३८ रोजी थोरोनं योमॅन गॅझेट या वृत्तपत्रात एक जाहिरात दिली होती. त्यात “एक नवीन शाळा उघडणार आहे, मर्यादित विद्यार्थ्यांनाच त्यात प्रवेश मिळेल” असं छापलं होतं. ही नवीन शाळा उघडणार्‍या शिक्षकाचं नाव दिलं होतं.. हेन्री डेव्हिड थोरो.

थोरोच्या मनात लेखक व्हायची इच्छा तशीच होती. पण आपले लेख आणि पुस्तकं विकून लवकर पैसे मिळतील याची त्याला खात्री नव्हती. चांगला लेखक व्हायचं असेल तर वेळ आणि कष्ट दोन्ही गोष्टींची गरज होती. दरम्यान थोरोला पैसे मिळवण्यासाठी काहीतरी करणं भाग होतं. त्यामुळे त्यानं स्वत:ची शाळा सुरु करायचा निर्णय घेतला. हेन्रीचा भाऊ जॉन त्याच शाळेत शिकवायला लागला.

एकोणिसाव्या शतकातल्या इतर शाळांसारखी थोरोची शाळा नव्हती हे उघड होतं. बहुतेक सगळ्या शाळांमध्ये मधली सुट्टी सोडून इतर वेळी मुलं एकाच ठिकाणी आपल्या बाकावर बसलेली असतं. पण हेन्री आणि जॉन दर आठवड्याला मुलांना घेऊन जंगलात सहलीला जायचे. तिथे मुलांना प्राणी आणि वनस्पती यांची माहिती द्यायचे. आसपासच्या नद्यांमध्ये नौकाविहाराला न्यायचे. कॉंकॉर्डमधल्या तळ्यांमध्ये पोहायला घेऊन जायचे.



त्याच्या अचूक ज्ञानामुळे “या जंगलात शंभर वर्षांत एखाद्यावेळीच घडणारी घटना जरी घडली असेल तरी तेव्हाही हेन्री तिथे हजर असेल आणि त्याला त्याबद्दल सगळी माहिती असेल” असं मुलं म्हणायची. हेन्रीला ती मुलं “प्रशिक्षक हेन्री” म्हणायची. सैनिक जसा ताठ उभा रहातो तसा हेन्री उभा रहायचा. सर्वसामान्यांच्या भाषेत सैनिकाला प्रशिक्षक म्हणायची पध्दत होती. त्यामुळे हेन्रीला प्रशिक्षक (trainer) हे नाव मिळालं.

पूर्वीच्या काळी रेड इंडियन लोकांची वस्ती असलेल्या गावांमध्ये हेन्री आपल्या विद्यार्थ्यांना घेऊन जायचा. न्यू इंग्लंडचे मूळ रहिवासी असलेल्या या लोकांच्या निवासस्थानी आता उंच गवत वाढलेलं होतं. पण कुठे हलक्या हातानं फावडं मारुन माती जरा बाजूला केली तर रेड इंडियन लोकांच्या दगडांपासून बनलेल्या चुली दिसतील ते हेन्रीला नीट माहिती असायचं. हे अवशेष जतन व्हावेत म्हणून मुलांना ते दाखवल्यानंतर हेन्री परत त्यांच्यावर माती लोटून द्यायचा.

रेड इंडियन लोकांनी तिथेच वस्ती का केली असावी हे थोरो आपल्या विद्यार्थ्यांना समजावून सांगायचा. त्यांना प्यायला पाणी मिळत असेल ते झरे आणि ते राहू शकतील अशा डोंगरकपारीतल्या गुहा शोधायला तो मुलांना सांगायचा. त्यामुळे मुलं रेड इंडियन लोकांच्या जीवनशैलीचाही अभ्यास करायची. निसर्गाकडून जेवढं आवश्यक असेल तितकंच रेड इंडियन लोक घेत होते. निसर्गाचा आपण एक भाग आहोत असं त्यांना वाटायचं. निसर्गाला नष्ट करणं किंवा त्यावर मात करणं असे विचार त्यांच्या मनात बिलकुल नव्हते.

निरनिराळी कामं लक्ष देऊन पहाणं आणि स्वत: करणं हा थोरोच्या विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षणाचा महत्वाचा भाग होता. त्याचे विद्यार्थी वृत्तपत्रांच्या ऑफिसमध्ये जाऊन वर्तमानपत्रं कशी छापली जातात ते पहायची. बंदूक बनवणार्‍या कारखान्यात जाऊन बंदूक कशी तयार होते ते पहायची. भू-मापन कसं केलं जातं तेही ती मुलं पहायला जायची.



या शाळेत मुलांना मारायला अजिबात परवानगी नव्हती. प्रत्येक विद्यार्थ्याला आपण चांगलं वागू आणि लक्ष देऊन शिकू अशी शपथ घ्यायला लागायची. "तुम्ही इथे फक्त खेळायला, रिकामटेकडे बसायला किंवा दुसरे कसे शिकतात ते पहायला येणार असाल तर इथे येऊ नका" असं दोघं भाऊ सरळ सांगायचे. पण मुलांना शिक्षा करणं त्यांना मान्य नव्हतं. त्यामुळे विद्यार्थी नीट वागत आणि शिक्षणात पण चमकत.

उन्हाळ्याच्या सुट्टीत हेन्री आणि जॉन यांनी मिळून एक नाव तयार केली. तिला नाव दिलं "मस्केटाक्विड (Musketaquid)". रेड इंडियन लोकांच्या भाषेत ते काँकॉर्ड नदीचं नाव होतं. मग ते दोघं नावेत शिधा आणि अन्न शिजवायला भांडीकुंडी घेऊन काँकॉर्ड आणि मेर्रिमाक नद्यांमधून नाव वल्हवत न्यू हॅंपशायरच्या प्रदेशांमध्ये खूप फिरले.

त्या प्रदेशात लोक नुकतेच येऊन स्थायिक झाले होते. जंगलाच्या मध्यातच काही नवीन शहरं उभी राहिली होती. हे हेन्रीच्या लक्षात आलं. कोल्हा जसा रेतीची घरं बनवतो तसं हे होतं. या शहराच्या सर्व बाजूंना मेपल आणि पाईनची झाडं होती ते पाहून हेन्रीला बरं वाटलं. "पाईनची बहरलेली झाडं आणि किलबिलणारे पक्षी अशा नैसर्गिक वातावरणाची आपल्या जगण्याची गरज" आहे असं हेन्रीनं याबद्दल लिहून ठेवलं होतं.



हेन्री आणि जॉन यांनी एकत्र केलेला हा शेवटचा प्रवास ठरला. १८४० साली जॉन आजारी पडला. त्या आजारातून बरा होण्याऐवजी त्याची प्रकृती खालावतच गेली. त्याला टायफॉईड झाला होता आणि शाळेत शिकवायला जाण्याइतकी ताकदच त्याच्या शरीरात उरली नाही.  हेन्रीला एकट्याला शाळा चालवायची नव्हती. त्यामुळे १८४१ सालच्या मार्च महिन्यात त्यानं "काँकॉर्ड ॲकेडमी" ही शाळा बंद केली.

आता उपजीविकेचं साधन शोधणं या पूर्वीच्याच समस्येनं परत तोंड वर काढलं. त्याच्या काही कविता प्रकाशित झाल्या असल्या तरी त्यातून पैसे मिळाले नव्हते.

मग तो छोटीमोठी कामं करायला लागला. त्यात त्याला करायला आवडत नव्हती अशीही काही कामं होती. एकदा तर त्यानं ७५ सेंट मिळवण्यासाठी डुकरांची घाण साफ केली होती. मनाच्या निराश अवस्थेत त्यानं "मी आता डोंगराच्या दक्षिणेला एक छोटी झोपडी बांधून राहीन. देव मला जसं ठेवेल ते मी स्वीकारेन" असं डायरीत लिहिलं होतं.

पण ती झोपडी बांधून रहायला जाण्याआधीच इमर्सननं त्याला आपल्या प्राचीन आणि भव्य घरात रहायला बोलावलं. घरातली लहानमोठी कामं आणि दुरुस्ती करण्यात इमर्सन थोरोइतका प्रवीण नव्हता. लवकरच दोघांमध्ये एक करार झाला. थोरो रोज आपल्या कष्टकरी हातांनी इमर्सनच्या घराची देखभाल करायचा. त्या बदल्यात इमर्सननं त्याच्या अभ्यासिकेत बसून लिखाण करण्याची थोरोला परवानगी दिली.

थोरो मग इमर्सनच्याच घरातल्या एका छोट्या खोलीत रहायला लागला. घरातल्या कामकाजांमध्ये तो किती हुशार होता ते त्यानं तिथे थोड्याच काळात दाखवून दिलं. तो बागेत माळीकाम करायचा, धुराडी साफ करायचा. इतकंच नव्हे तर सौ. इमर्सन यांच्यासाठी त्यानं एक कपाटही तयार केलं. पण इमर्सनसाठी थोरो घरातली ही कामं करणारा यापेक्षा खूप महत्वाचा होता. इमर्सन व्याख्यानं द्यायला बाहेरगावी जायचा तेव्हा घराची काळजी घ्यायला थोरो आहे यानं तो निश्चिंत असायचा.

इमर्सनच्या वाल्डो, ॲलन, एडिथ आणि एडवर्ड  या मुलांबरोबर थोरोची चांगलीच मैत्री झाली होती. तो त्या मुलांमध्ये रमला आणि त्यांच्यात एक घनिष्ट नातं निर्माण झालं. "आम्हा मुलांसाठी तो मोठ्या भावासारखा होता. लवकरच तो आमचा मित्र, सहलींमध्ये मार्गदर्शक आणि नंतरच्या काळात कँपिंगच्या दौर्‍यांचा सल्लागार झाला" असं एडवर्ड इमर्सन एकदा म्हणाला होता.

संध्याकाळच्या सुमारास सगळी मुलं हेन्रीभोवती जमायची. त्याच्या हाताला धरुन शेकोटी असलेल्या खोलीत घेऊन जायची. हेन्री त्यांना कधी आपल्या बालपणातल्या धाडसांच्या, किंवा त्या दिवशी पाहिलेली खार, चिचुंद्री किंवा रंगीबेरंगी पक्षी यांच्या गोष्टी ऐकवायचा.

१८४२ च्या जानेवारीत थोरोला त्याचा भाऊ जॉन खूप आजारी असल्यामुळे अचानक इमर्सनचं घर सोडून जावं लागलं. जॉनला धनुर्वात झाला होता. त्या काळी या आजारानं अनेक जणांचा मृत्यू व्हायचा. त्यामुळे धनुर्वात हा गंभीर आजार मानला जायचा. काही दिवसांपूर्वी दाढी करताना वस्तर्‍यामुळे जॉनच्या बोटाला जखम झाली होती. सुरुवातीला ती जखम मामुली वाटली. त्यानं त्यावर एक कापडी पट्टी बांधली. पण मग ती जखम चिघळली. जॉनची अवस्था उपचारांपलीकडे गेली. हेत्रीच्या बाहुपाशात जॉननं प्राण सोडला.

त्यानंतर दोन आठवड्यांमध्येच थोरोला अजून एक धक्का बसला. पाच वर्षांचा वाल्डो लाल तापानं मरण पावला. थोरोला याचा खूप विषाद वाटला. अस्वस्थ मन:स्थितीत त्यानं "मागचा महिना मला एक वर्षाइतका दीर्घ वाटला" असं आपल्या डायरीत लिहून ठेवलं.

थोरो परत इमर्सनच्या घरात रहायला लागला. पण १८४३ साली त्याला हवापालटाची गरज भासली. मग तो न्यूयॉर्कला "स्टॅंटन आयलॅंड"वर गेला. तिथे त्यानं काही काळ विल्यम या इमर्सनच्या भावाच्या मुलांना शिकवण्याचं काम केलं.

पण काही काळातच त्याला कॉंकॉर्डची आठवण बेचैन करायला लागली. आपल्याला आयुष्यात जे काही करायचं असेल ते कॉंकॉर्डमध्ये राहूनच करायला हवं याची तेव्हा त्याला जाणीव झाली. "माझ्या चपला आणि माझ्या हॅटमध्ये मी कॉंकॉर्डची जमीन घेऊनच फिरतो.. मी कॉंकॉर्डच्या मातीतच जन्म घेतला आहे ना..!" असं त्यानं तेव्हा वहीत नोंदवलं होतं.

*"सजग रहाणं हेच आयुष्य आहे..!"*

## प्रकरण ५ : हेच ते आयुष्य..!

थोरो परत एकदा कॉंकॉर्डमध्ये वडिलांच्या पेन्सिल तयार करण्याच्या कारखान्यात काम करायला लागले. एकीकडे त्याचे हात दिवसभर पेन्सिली तयार करण्यात गर्क असायचे. दुसरीकडे मनात मात्र वेगळ्याच गोष्टी आकार घेत असायच्या. त्यात एक दिवस जॉननं केलेल्या नौकेच्या सफरीवर पुस्तक लिहिण्याचं त्यानं योजलं.

पण कामात गुंगलेल्या थोरोकडे लिहिण्यासाठी वेळच मिळत नव्हता. आयुष्य जगण्याचा याहून चांगला मार्ग असलाच पाहिजे असं त्याला वाटायचं. आपल्याला ज्या कामात बिलकुल रस नाही ते काम करण्यात माणसं आयुष्यातला सर्वाधिक वेळ खर्च करतात, हे त्याच्या समजुतीच्या पलीकडचं होतं. आपण मुंग्यांसारखं एक अर्थहीन आयुष्य जगतो असं त्याला वाटायचं. जास्तीत जास्त आणि रुचकर अन्न, भव्य घर आणि महागडे कपडेलत्ते अशा निरुपयोगी गोष्टी मिळवण्यासाठी आपण काम करत रहातो असं त्याचं याबद्दल म्हणणं होतं.

साधं जेवण, त्यासाठी लागणारं इंधन आणि शरीराला उब देणारे साधे कपडे या मूळ गरजा भागवण्यासाठी काम केलं तर जास्त बरं.. असं थोरोला वाटायचं. या गरजांपुरतं काम केलं तर आयुष्याचं प्रयोजन शोधणं आणि आनंदप्राप्ती यासाठी लोकांना वेळ मिळेल असं त्याचं मत होतं.

यासाठी थोरोनं स्वत: एक प्रयोग करायचा ठरवला. त्यानं सगळ्या सुखलोलुपतेपासून मुक्त असलेलं एक साधंसोपं आयुष्य जगायचं ठरवलं. पैसे आणि इतर संसाधनं यांचा कमीत कमी वापर करुन रहाण्याचा त्याचा विचार होता. त्यामुळे त्याला लिखाणाला वेळ देता आला असता. अस्तित्वाचा हेतू काय आहे यावर चिंतन आणि मनन करता आलं असतं.

या प्रकारच्या आयुष्याची केवळ कल्पना मनात आल्यामुळेही थोरोला उत्साह वाटायला लागला. "आयुष्य म्हणजे हेच.." असं त्यानं लिहिलं. "हा अनोखा प्रयोग आहे आणि त्याबद्दल मी फारसा विचार केलेला नाही" असंही त्यानं तेव्हा नोंदवलं होतं. थोरोच्या या प्रयोगासाठी रहाण्याच्या जागेची व्यवस्था इमर्सननं केली. त्यानं वॉल्डनच्या तळ्याकाठी नुकत्याच खरेदी केलेल्या जमिनीवर रहाण्याची थोरोला परवानगी दिली.

१८४५ च्या वसंत ऋतूमध्ये आपल्या वयाच्या २७व्या वर्षी थोरो वॉल्डनच्या तळ्याकाठी रहायला गेला. तळ्याकाठी एका ठिकाणी त्यानं एक खोली बांधली. तिथे रेतीसारखी बारीक माती खोदून एक शौचालयही बांधलं. इमर्सन आणि इतर शेजार्‍यापाजार्‍यांनी त्या खोलीच्या भिंती आणि छत बांधायला मदत केली. एक माणूस त्या खोलीत आनंदात राहू शकला असता. "अंगावर ओव्हरकोट चढवणं हे जितकं सहज घडतं तितकी ती खोली सुसज्ज होती" असं थोरोचा एक मित्र म्हणायचा.

अमेरिकन स्वातंत्र्यदिवस म्हणजे ४ जुलैच्या दिवशी थोरोनं त्या खोलीत रहायला सुरुवात केली. पलंग, टेबल, खुर्ची आणि स्वयंपाकासाठी थोडी भांडीकुंडी असं मोजकंच सामान त्यानं आपल्याबरोबर नेलं होतं. आपल्याला अत्यंत साधंसुधं आयुष्य जगायचं आहे याची तो स्वत:लाच सारखी आठवण करुन देत होता. हे साधंसुधं आयुष्यच व्यक्तीगत मुक्ततेकडे घेऊन जाईल याची त्याला खात्री होती.





या नवीन घरात थोरो रोज सकाळी लवकर उठायचा. पहाटेच्या वेळी आपलं शरीर आणि मन प्रफुल्लित असतं आणि आधीच्या दिवसातल्या चिंता आणि काळज्या नाहीशा झालेल्या असतात असं त्याच्या लक्षात आलं. तेव्हाच्या खर्‍याखुर्‍या संपूर्ण जागृतावस्थेत त्याच्या मनात नवीन विचार स्फुरायला लागत. "अशा सकाळी या जागृतावस्थेत माझ्या मनातही एक पहाट पालवते" असं त्यानं मनाच्या या अवस्थेबद्दल लिहिलं होतं.

"खूप तुरळक लोकांनाच अशा जागृतीच्या अवस्थेचा अनुभव येऊ शकतो. त्यामुळे अनेकजण रोज नवीन काहीतरी शिकण्याची, विचारांच्या कक्षा रुंदावण्याची संधी घालवतात. खरं तर ही जागृत अवस्था असणं हे जिवंत माणसाचं लक्षण आहे" असं थोरोचं म्हणणं होतं.

सकाळपासून थोरोची दिनचर्या ठरलेली होती. तो आपली खोली झाडून पुसुन घ्यायचा. बागेत काम करण्याइतकी बाहेर हवा चांगली असेल तर ते काम करायचा. "बागेतल्या झाडाझुडपांवर माझं प्रेम होतं. ते मला इथल्या धरणीशी जोडून ठेवतात. मला त्यातून अपार उर्जा मिळते" असं त्याचं म्हणणं होतं.



हिवाळ्यात थोरो पैसे मिळवण्यासाठी छोटीमोठी कामं करायचा. इमारतींची कुंपणं दुरुस्त करणं, रंग देणं अशी कामं तो करायचा. एका माणसासाठी त्यानं धुराडं बांधलं तर दुसऱ्यासाठी लाकडं ठेवण्यासाठी गोदाम बांधून दिलं. सहा आठवडे काम करुन तो वर्षभर गुजराण होईल इतके पैसे कमवायचा. "आपण जर बुध्दीचा वापर करुन साधंसुधं आयुष्य जगायचं ठरवलं तर गुजराण होणं काही अवघड नाही. उलट ते हसतखेळत जमण्यासारखं आहे" असं थोरो म्हणायचा.

वर्षातले काही दिवस मात्र सृष्टीचं रुप खूप लोभस असायचं. तेव्हा काम करणं बरोबरच नाही. " सृष्टीसौंदर्य न्याहाळण्याऐवजी काम करण्यासारखी कुठलीच तडजोड अशा देखण्या दिवसांमध्ये करणंच शक्य नसायचं" अशा त्या दिवसांच्या त्याला आठवणी यायच्या.

सकाळच्या कोवळ्या उन्हात पक्ष्यांचा किलबिलाट ऐकत तो घराबाहेर कित्येक तास शांत बसायचा. देवदार आणि इतर उंच वृक्षांच्या सावलीत तो निवांत असायचा. वॉल्डन तळ्याकडे जाणाऱ्या रस्त्यावर जंगलातल्या बेरीजचा खच पडलेला असायचा. त्या बेरीजचे रंग मोहक असले तरी चवीला मात्र त्या आंबट असायच्या. तिथे थोरो चुपचाप बसून रहायचा. बाहेरच्या झाडांवर फिरणाऱ्या आणि खोलीतल्या खिडक्यांमधून आत बाहेर मुक्त संचार करणाऱ्या पक्ष्यांच्या मध्ये त्याला यायचं नसायचं.

थोरोला तळ्यात नौकाविहार करायला आणि स्फटिकासारख्या पारदर्शक पाण्यात लगबगीनं चमचमणाऱ्या मासोळ्या पहायला खूप आवडायचं. "ग्रीष्मातल्या उष्ण संध्याकाळी मी माझ्या नौकेत बसून बासरी वाजवायचो" असं त्यानं लिहिलं होतं. "मासोळ्या माझ्या होडीकडे आकर्षित झाल्यानं तिच्या चारही बाजूंना विहरत असायच्या. पाण्यातलं चंद्राचं प्रतिबिंब पाहून चंद्र त्या पाण्याच्या तळाशी पडलेल्या काटक्यांमध्ये लपायचा प्रयत्न करतोय" असं वाटायचं अशी सुरेख वर्णनं त्यानं केलेली आहेत.
"



थोरो वॉल्डनच्या तळ्याकाठी अगदी एकटाच रहात असला तरी त्याला कधी एकाकी वाटत नसे. अधूनमधून तो आपल्या कुटुंबियांना भेटायला शहरात जायचा. इमर्सनच्या कुटुंबातले लोक त्याच्या तळ्याकाठच्या घरात जेवण करायचे. जंगलात फेरफटका मारुन बेरीज गोळा करायचे.

इतरही काही लोक त्याला भेटायला यायचे. ”मी जंगलात रहात असताना जितके लोक मला भेटायला आले, तितके लोक माझ्या आयुष्यात परत कधीच आले नाहीत” असं त्यानं लिहिलं होतं. कॉकॉर्डच्या लोकांना शहरी आयुष्यातून निवांतपणा हवा असेल तर ते वॉल्डनच्या तळ्याकाठी यायचे. त्यापैकी अनेकजणांना थोरोशी बोलायचं असायचं. ते त्याच्या घरी जायचे. जंगलात एकट्या रहाणार्‍या या माणसाबद्दल त्यांना कुतूहल असायचं. मुक्त आयुष्याच्या शोधात जंगलात येणार्‍या या अनोख्या लोकांना थोरो खरे यात्रेकरु म्हणायचा.

अशाच अनोख्या  लोकांमध्ये एक व्यक्ती होती खूप सारे केस डोक्यावर असलेला लाकूडतोड्या अलेक थेरियन. अलेकपेक्षा साध्या सरळ स्वभावाचा आणि नैसर्गिकत:च अंत:करणात भलाई असलेला माणूस मिळणं अशक्य होतं असं थोरोनं लिहून ठेवलं होतं. अलेकच्या मांसल मानेवर उन्हानं चट्टे पडले होते. सरळ स्वभावाच्या अलेकला एखादी गोष्ट खूप आवडली किंवा मजेदार वाटली तर हसताना तो जमिनीवर लोळण घ्यायचा.

कॉंकॉर्डमधली मुलंही थोरोकडे येत असत. त्यांच्याबरोबर  तो कायम उत्साही शिक्षकाच्या भूमिकेत असायचा. एका मुलीनं त्याबद्दल.. “आम्हाला तो जंगलातल्या मधुर बेरीज, लपलेली घरटी, दुर्मिळ फुलं अशा गोष्टी दाखवायचा” असं सांगितलं होतं. ही मुलं थोरोकडून निसर्गावर प्रेम करायला शिकत होतीच पण निसर्गाचं रक्षण आणि संवर्धन करायलाही शिकायची.

“एकही झाड किंवा झुडुप नष्ट होऊ नये, कोणत्याच पक्ष्याच्या अंड्याला धक्का लागू नये” अशी थोरोची शिकवण त्या मुलीला चांगलीच आठवते.

कधी कधी गुलामगिरीच्या प्रथेतले गुलाम असह्य होऊन थोरोच्या घरी यायचे. ते सर्वजण “भुयारी रेल्वे”मधून कॅनडाला जायचे. “भुयारी रेल्वे” नावाचं एक गुप्त दल होतं. त्यातले सदस्य या गुलामांना गुलामगिरीच्या बाहेर पडून उत्तरेकडे पोचवायला आणि मुक्त आयुष्य जगायला मदत करायचे. आपल्या कुटुंबातल्या इतर सदस्यांप्रमाणेच थोरोलाही गुलामगिरीची प्रथा नष्ट व्हायला हवी होती. तो या भेदरलेल्या लोकांना रात्रीपुरता हवा असलेला आसरा द्यायचा. शिकारी कुत्र्यांमुळे घाबरलेल्या कोल्ह्यासारखे ते भीतीमुळे सतत सावध रहायला शिकलेले असायचे.

वॉल्डनच्या तळ्याकाठी फक्त एक साधंसुधं आयुष्य जगणं एवढंच थोरोचं उद्दिष्ट नव्हतं. त्याला लेखनही करायचं होतं. वर्षभरात त्यानं जॉनबरोबर केलेल्या नौकेच्या सफरीवर एक पुस्तक लिहिलं. “कॉंकॉर्ड आणि मर्मांकच्या नद्यांमध्ये घालवलेला एक आठवडा” असं त्या पुस्तकाचं नाव होतं. त्यानंतर जंगलातल्या आपल्या आयुष्यावरही त्यानं पुस्तक लिहायला सुरुवात केली.

या पुस्तकातून त्यानं आपण तिथे कसे रहात होतो, तिथे भीती किंवा एकटेपणा का जाणवला नाही त्याबद्दल लिहिलं होतं. थोरो आपल्या प्रयोगातून काय शिकला ते या पुस्तकात होतं. त्यामुळे वाचकांना आपल्या आयुष्यात तसेच प्रयोग करायला प्रेरणा मिळू शकत होती. त्या पुस्तकाचं नाव होतं “वॉल्डन..!”

*"नवीन भूभाग शोधायला कोलंबसासारखं व्हा.."*

## प्रकरण ६ : एक जिज्ञासू प्रवासी

वॉल्डन या पुस्तकात हेन्री थोरोनं तळ्याकाठी व्यतीत केलेल्या आयुष्याबद्दल सविस्तर लिहिलं होतं. निसर्गाची अनेक गुपितं निसर्गासमवेत राहिल्यानं त्याला कळली होती. जीवनमृत्यूच्या आवर्तनाबद्दलही त्यानं लक्षपूर्वक जाणून घेतलं. ऋतूचक्रामुळे सृष्टीत घडणारे बदलही त्याला बारकाईनं जाणवले होते.

"जीवो जीवस्य जीवनम" ही जंगलातल्या प्राण्यांची साखळी त्याला तिथेच कळली. बेडकांची अंडी उबल्यानंतर तळ्यात बेडकांची पिल्लंच पिल्लं दिसायची. इतक्या जास्त संख्येनं जन्म घेतल्यामुळेच बेडकांच्या जातीचं अस्तित्व टिकून रहातं. याच बेडकांच्या पिल्लांमुळे इतर प्राण्यांना भरपूर अन्न मिळायचं. बगळ्यांसारखे पक्षीदेखील बेडकाची पिल्लं पोटभर खायचे.

प्राणी असे मरताना पाहून थोरोला दु:ख व्हायचं. जंगलात रक्तमांसाचा सडा पडतोय असं त्याला वाटायचं. पण यामुळे कोणतीच एक प्रजाती बेसुमार वाढत नाही हे त्याच्या लक्षात आलं. निसर्गाचा समतोल असा राखला जातो. जन्ममृत्यूचं हे चक्र निसर्गव्यवस्थेचा एक अविभाज्य भाग होता.



प्राण्यांचं कोणतं शारीरिक वैशिष्ट्य त्यांना स्वत:चं रक्षण करायला मदत करतं हे जाणून घ्यायला थोरोला खूप आवडायचं. उदाहरणार्थ, हिवाळ्यातल्या एका संध्याकाळी एक ससा थोरोच्या घराजवळ येऊन चुपचाप बसला होता.



त्या सशाचे लांब कान आणि तीक्ष्ण नाक असलं तरी तो अगदी अशक्त आणि दुबळा होता. थोरोला तो एकदम असहाय्य आहे असं वाटत होतं. पण थोरोनं त्याच्या दिशेनं एक पाऊल टाकताच टुणकन उडी मारुन तो बर्फावरुन पळत दूर गेला. सशाचं शरीर दुबळं होतं पण ते आजारामुळे नव्हतं तर शरीराचं वजन कमी असल्यानं संकटात तो पटकन दूरपर्यंत पळू शकत होता हे थोरोला कळलं. "त्याचा हडकुळेपणा अकारण नव्हता" असं थोरोनं वहीत नोंदवून ठेवलं.

थोरो निसर्गसौंदर्यामुळे मंत्रमुग्ध व्हायचा. मासोळ्यांचे रंगीबेरंगी रंगदेखील सुंदर दिसायचे. पिकरेल हा मासा तर खूपच सुंदर असल्याचं त्याच्या लक्षात आलं. “पिकरेलच्या भोवतालच्या पाण्याचाही रंग बदलल्यासारखा दिसायचा. पिकरेलचा रंग देवदाराच्या वृक्षांसारखा हिरवाही नाही, दगडांसारखा राखाडीही नाही आणि आकाशासारखा निळसरही नाही. पिकरेलचा रंग एखाद्या फुलाच्या रंगासारखा, मण्यांसारखा किंवा मोत्यांसारखा तेजस्वी होता” अशी नोंद त्यानं केली होती.

निसर्गात माणूस एकटा नसतो याची प्रखर जाणीव थोरोला होत होती. काँकॉर्डच्या जंगलात पूर्वी रहाणार्‍या रेड इंडियन लोकांसारखाच तो निसर्गाचाच एक भाग झाला होता. “निसर्ग आणि माणूस हे वेगळे नाहीत. पक्ष्यांनादेखील मी त्यांचा शेजारी वाटायला लागलो” असं त्यानं लिहिलं होतं.

वॉल्डनचं शांत पहुडलेलं तळं थोरोला सतत सोबत करायचं. ऋतूमानानुसार त्यात होणार बदल न्याहाळणं हा थोरोच्या आवडीचा भाग होता.

वॉल्डनचं तळं खोल होतं. त्यामुळे उन्हाळ्यातही कडक ऊन पडलं तरी त्याचं पाणी थंड असायचं. उन्हाळ्यातली एखाद्या स्तब्ध दुपारी वॉल्डनचं तळं आरशासारखं स्पष्ट आणि देखणं दिसायचं.

नोव्हेंबरच्या महिन्यात तळ्यातल्या पाण्यावर छोटे खळगे दिसायचे. पावसाच्या पाण्यानं पडावेत तसे ते खळगे प्रत्यक्षात पर्च नावाचे पिवळसर चिमुकले मासे पाण्यात खेळत असल्यामुळे दिसायचे.



थंडीत पाण्याचं बर्फ झाल्यावर त्यावर ओथंबून थोरो बर्फातले पाण्याचे बुडबुडे पहायचा. हे बुडबुडे चमकायचे. तेव्हा बर्फात चेहर्‍याचं प्रतिंबिब सुध्दा स्पष्ट दिसायचं.

वसंत ऋतूमध्ये तळ्याच्या भोवती झाडांवर पालवी फुटायची. काही झाडांवर कळ्या फुलायला लागायच्या. मेघाच्छादित आकाशातून मधूनच डोकावणार्‍या सोनेरी सूर्यकिरणांमुळे तळ्यावर, झाडांवर, पहाडांवर दिसणारा प्रकाश मनमोहक असायचा.



वॉल्डन हा धरित्रीचा एक डोळा असावा अशी थोरो कल्पना करायचा. तळ्याकाठी उगवलेली झाडं त्या डोळ्याच्या पापण्या, भोवतालचे पहाड या भुजा असाव्यात अशीदेखील त्याच्या मनात कल्पना यायची. आपल्या जवळ उभ्या असलेल्या व्यक्तीच्या डोळ्यात आपलं प्रतिबिंब दिसतं तसं त्या डोळ्यात थोरोला आपलं प्रतिबिंब दिसायचं. निघून गेलेल्या काळाच्या ओघात आपल्यात किती बदल झालेत ते प्रतिबिंब बघून थोरोला जाणवायचं.

तो तरुण असताना  वॉल्डन कायमस्वरुपी सुंदर आणि अस्पर्श अवस्थेतच राहिल असं थोरोला वाटायचं. “मी इथे पहिल्यांदा नौकाविहारासाठी आलो तेव्हा ते तळं सर्व बाजूंनी पाईन आणि ओकच्या घनगर्द झाडांनी घेरलेलं होतं” असं त्यानं लिहिलं होतं.

पण माणसं ही नैसर्गिक साधनसंपत्ती नष्ट करु शकतात असं थोरोच्या नंतर लक्षात आलं. “लोकांना लाकडापासून तयार झालेल्या गोष्टींची गरज होती. वॉल्डनच्या तळ्याजवळच्या जंगलात बेसुमार वृक्षतोड व्हायला लागली होती. लाकूडतोडे हे जंगल धीम्या गतीनं संपवत चालले आहेत.. खूप सारी झाडं तोडल्यामुळे या वनात पूर्वीसारखं भटकायचा आनंद मला आता अनेक वर्षं घेता येणार नाही” अशी खंत त्याच्या वहीत उमटलेली दिसते.

झाडं तोडल्यामुळे तिथलं निसर्गसौंदर्य तर संपत होतंच पण वन्य प्राण्यांचं आयुष्यदेखील धोक्यात आलं होतं. “पक्ष्यांची घरटीच जर नष्ट झाली तर तिथे आता पक्ष्यांची किलबिल ऐकू येईल अशी अपेक्षा तरी कशी करता येईल?” असं थोरोचा प्रश्न होता.

माणसं या निसर्गाचं इतर अनेक प्रकारे नुकसान करत होती. तळ्याकाठी रेल्वेचे रूळ आले होते. रेल्वेची शिट्टी ऐकून थोरोनं "शेतकर्‍याच्या गोठ्याभोवती बहिरी ससाणा किंचाळत असल्यासारखं वाटतं" असं लिहिलं होतं. तिकडे काँकॉर्डचे नागरिक आपल्या शहरात पाण्याची व्यवस्था करण्यासाठी वॉल्डनच्या तळ्यापासून पाईपलाईन टाकायची तयारी करत होते.

लोकांचा निसर्गाकडे पहाण्याचा दृष्टिकोन काय आहे ते समजावून घेण्याचा थोरो प्रयत्न करत होता. अनेक लोकांना जंगल एक भयंकर आणि अपरिचित ठिकाण वाटायचं. लोकांना जंगलातून मिळणारं लाकूड, धातू आणि इतर उपयोगी वस्तू हव्या होत्या. पण निसर्गाचं महत्व याहून कित्येक पट अधिक आहे असं थोरोचं मत होतं.

वॉल्डन मध्ये त्यानं घालवलेल्या वेळामुळे त्याला आयुष्याबद्दल महत्वाची गोष्ट लक्षात आली होती. नवनवीन अनुभवांमुळे लोकांच्या विचारात बदल घडतो. ज्यामुळे त्यांना नवीन गोष्टी शिकायला आणि स्वत:चा विकास करुन घ्यायला संधी मिळते. याचा परिणाम म्हणून ते खर्‍या अर्थानं सजग आयुष्य जगायला लागतात.

"आपल्या आयुष्यात कितीही रुळले असले तरी लोक आपल्या सवयी बदलू शकतात" असं थोरो म्हणायचा. "आपल्या शेताभोवती उंच भिंती बांधल्या तर त्यात आपलं आयुष्य मर्यादित होऊन जाईल आणि आपलं दैव सुनिश्चित होईल असं मानणं चुकीचं आहे" असं थोरो म्हणत असे.

थोरोनं आपल्या वाचकांना जीवनात काही प्रयोग करायचा सल्ला दिला होता. "समोर येईल तसं आयुष्य जगण्यापेक्षा आयुष्याची सफर एका जिज्ञासू प्रवाशासारखी करा. कोलंबसानं जसं जहाजातून नवीन भूभाग शोधले तसे तुम्ही तुमच्या मनात नवीन बेटं आणि नवीन भूभाग शोधत रहा.. मात्र ते व्यापार करण्यासाठी नसतील, तर विचारप्रवृत्त होण्यासाठी असतील" असा संदेशन त्यानं दिला होता.

थोरो जेव्हा तळ्याकाठी रहायला आला होता ते त्याच्या आयुष्यातलं मोठं वळण होतं. आजूबाजूच्या डहाळ्या बाजूला करुन त्यानं झाडाझुडपांमधून चालायला सुरुवात केली तेव्हा त्याला रोमहर्षक दृश्यं आणि मधुर आवाज पहायला आणि ऐकायला मिळाले. नवीन विचार आणि नवीन संवेदना त्याच्या मनात जागृत झाल्या. पण लवकरच वॉल्डनचं घर त्याला सवयीचं झालं. घरापासून तळ्यापर्यंत जायला एक पायवाटही तयार झाली होती.

पण त्या पायवाटेनं त्याचं मन क्षुब्ध झालं नव्हतं. त्याला मनातल्या विचारांची काळजी त्या रूळलेल्या पायवाटेपेक्षा जास्त होती. आपलं दैनंदिन आयुष्य आणि सभोवतालचं वातावरण त्याला सवयीचं झालं होतं. त्याच्या मनात नवीन विचार येणं जवळपास बंद झालं होतं. यामुळेच "आपल्याला समाधान वाटेल असं एक सवयीचं आयुष्य आखून लोक किती आश्वस्त होतात" याचं त्याला आश्चर्य वाटायचं.

१८४७च्या ग्रीष्म ऋतूमध्ये एक गोष्ट थोरोच्या लक्षात आली. ती म्हणजे त्याला स्वत:ची उन्नती करुन घ्यायची असेल, पूर्णपणे विचारांच्या पातळीवरही जिवंत रहायचं असेल तर परत एक मोठा बदल आवश्यक होता. हे छोटं तळं सोडायची आता वेळ झाली होती.

“मी ज्या कारणासाठी जंगलात रहायला गेलो, त्याच कारणासाठी मी तिथून निघालो” असं वॉल्डन या पुस्तकात त्यानं लिहिलं होतं. “मला आयुष्य समृध्द करण्यासाठी अनेक वेगवेगळ्या पध्दतीत जगायला हवं होतं, या एका प्रकारे जगण्यासाठी मी याहून जास्त वेळ देऊ शकत नव्हतो असं मला वाटायला लागलं” हे त्याचं मत होतं.

६ सप्टेंबर १८४७ या दिवशी थोरोनं वॉल्डनचं तळं सोडलं. त्याला तिथे येऊन दोन वर्षं, दोन महिने आणि दोन दिवस झाले होते. तो तेव्हा ३० वर्षांचा होता. काहीतरी नवीन प्रयोग करायची त्याच्या मनात उत्सुकता होती.

अर्थात वॉल्डनच्या तळ्याकाठी मिळालेलं शिक्षण त्याच्या मनात कायम होतं. त्यानं तेच आपल्या वाचकांनाही सांगितलं होतं..

*जर कोणी निर्भयतेनं आपल्या स्वप्नांच्या दिशेनं प्रवास करायला सुरुवात केली, आपलं आयुष्य आपल्या मनातल्या कल्पनेप्रमाणं जगायचा प्रयत्न केला, तर इतरांना सहजपणे प्राप्त न होणारं यश त्याल लाभेल इतकं तर कमीत कमी मी माझ्या या प्रयोगांमधून शिकलो..*

*“मृत्यू तुमच्या तितक्याच जवळ आहे.. जितका माझ्या जवळ आहे..”*

## प्रकरण ७ : एका दूरच्या देशात

१८४६च्या जुलै महिन्यात वॉल्डन तळ्याकाठी रहात असतानाच थोरो एक दिवस काँकॉर्डला गेला. त्यानं आपले बूट चांभाराकडे दुरुस्तीला दिले होते. ते घ्यायचे होते. काँकॉर्डमधल्या आपल्या शेजार्‍यांनाही त्याला भेटायचं होतं. थोरोनं त्या शहराला “आकाशवाणीचं एक महत्वाचं केंद्र” असं नाव दिलं होतं. तिथे कानगोष्टी एकाकडून दुसर्‍याकडे आणि एका वर्तमानपत्राकडून दुसर्‍या वर्तमानपत्राकडे प्रवास करायच्या. जंगलातल्या पानांची सळसळ किंवा बेडकांचा उच्चरव ऐकून त्याला जितकी मजा यायची तितकीच मजा कधी कधी थोरोला त्या गप्पा ऐकण्यात यायची.

जुलैतल्या त्या संध्याकाळी थोरोची सॅम स्टेपल्स या हवालदाराशी भेट झाली. पण स्टेपल्स तेव्हा गप्पा मारण्याच्या मूडमध्ये नव्हता. याऊलट “थोरोनं गेली सहा वर्षं व्यक्तीकर भरलेला नाही” अशी त्यानं तक्रार केली. वीस ते सत्तर वर्षांच्या दरम्यानच्या प्रत्येक माणसाला हा कर अनिवार्य होता. थोरोनं हा कर लगोलग भरला नाही तर त्याला तुरुंगाची हवा खावी लागेल असं स्टेपल्सनं थोरोला धमकावलं.

थोरोनं आपला कर मुद्दामच भरला नव्हता. गुलामगिरीला संमती देणाऱ्या सरकारकडे कर भरायची त्याची इच्छा नव्हती. याशिवाय, तेव्हा अमेरिका आणि मेक्सिको यांच्यात युध्द चाललं होतं. या युध्दातून दक्षिणेकडे गुलाम बाळगणाऱ्या सावकारांसाठी अमेरिका जास्त भूभाग हडपायचा प्रयत्न करत होती असं थोरोचं मत होतं. तो त्या युध्दाच्या प्रचंड विरोधात होता. कर भरुन त्या युध्दाला मदत करायची त्याची बिलकुल इच्छा नव्हती.

कायद्याचं पालन करण्याऐवजी आपल्या आत्म्याचा आवाज ऐकायचा असा थोरोचा निश्चय होता. "अमेरिकेनं गुलामगिरीची प्रथा नष्ट केली आणि मेक्सिकोबरोबरचं युध्द संपवल्यानंतर कर भरणार" असं त्याचं म्हणणं होतं. तुरुंगातच जायचा प्रश्न असेल तर तो म्हणाला, "सॅम, मी लगेच तुरुंगात जायला तयार आहे."

अखेरीस त्या हवालदारानं थोरोला पकडलं. त्याला कॉंकॉर्डच्या कारागृहात नेलं. त्या इमारतीला मोठमोठ्या दगडी भिंती, लोखंड आणि लाकूड यांचे मजबूत दरवाजे होते. आयुष्याचा अर्थ सर्वतोपरी जाणून घेण्याची इच्छा असलेल्या थोरोला त्या दिवशी तुरुंगातल्या आयुष्याबद्दल जाणून आणि समजून घ्यायचं होतं. तुरुंगात एक रात्र घालवणं म्हणजे थोरोसाठी कल्पनेतही जिथे कधी पोचलो नाही, तशा एखाद्या अनोळखी प्रदेशाची सफर करण्यासारखं होतं.

तुरुंगाच्या खिडकीच्या गजांपलीकडून कॉंकॉर्डच्या रस्त्यांवरचे आवाज रात्री थोरोला ऐकू येत होते. बराकीतल्या दुसऱ्या कैद्याशी गप्पा मारत असताना त्याला एका शेताला आग लावण्याच्या गुन्ह्याखाली पकडल्याचं थोरोला कळलं. गप्पा मारताना तो इतका चांगला वाटत होता. त्यामुळे त्यानं ती आग जाणून बुजून लावली असेल असं थोरोला वाटलं नाही. सिगारेट ओढताना झोप लागली आणि थोटुक विझवायचं राहिल्यानं आग लागली असावी.



हेत्रीला पकडल्याची बातमी लवकरच थोरोच्या कुटुंबियांपर्यंत पोचली. रात्री थोरोच्या कोणत्यातरी नातेवाईकानं हवालदाराकडे येऊन कर भरला.

दुसर्‍या दिवशी स्टेपल्स थोरोला सोडून द्यायला तयार होता. पण थोरोनंच तुरुंगातून जायला नकार दिला. सगळ्यांना आपल्या कैदेबद्दल माहिती व्हावी अशी त्याची इच्छा होती. यामुळे लोकांचं लक्ष गुलामगिरीच्या कुप्रथेच्या विषयाकडे वळेल अशी त्याला आशा वाटत होती. पण सॅम स्टेपल्स त्याला म्हणाला, “हेत्री, तू बाहेर जाणार नसलास तर मला जबरदस्तीनं तुला बाहेर काढावं लागेल. तू आता इथे राहू शकत नाहीस”.

थोरो तुरुंगाबाहेर आला आणि काही मित्रांबरोबर जंगलात बेरीज तोडायला निघून गेला. तुरुंगातल्या त्या एका रात्रीबद्दल त्यानं नंतर एक लेख लिहिला. “सामाजिक असहकाराचं कर्तव्य या विषयावरच्या त्या लेखात चुकीच्या कायद्यांना अनुसरुन वागण्यापेक्षा आपल्या आत्म्याचा आवाज ऐका असं आवाहन केलेलं होतं. जास्तीतजास्त लोकांनी तसं केलं तर शांततेच्या मार्गानं हवा तो बदल आणता येईल असं त्याचं मत होतं.”

१८५७ साली थोरोनं परत एकदा गुलामगिरीची प्रथा संपवण्यासाठी काम सुरु केलं. जॉन ब्राऊन नावाचा गुलामगिरीच्या प्रथेच्या विरोधात लढणारा नेता या कामासाठी आर्थिक मदत जमवायला काँकॉर्डमध्ये आला होता. गुलामांच्या सुटकेसाठी बळाचा अवलंब सुध्दा करावा या मताचा ब्राऊन होता. पण हे कसं करायचं याबद्दल त्याच्याकडे स्पष्टपणा नव्हता. थोरोकडे फारसे पैसे नव्हते पण ब्राऊनला त्यानं इतर प्रकारे मदत केली.

१८५९ सालच्या ऑक्टोबरमध्ये थोरो आपल्या कुटुंबियांबरोबर राहून घरातली छोटी मोठी कामं करत होता. तेव्हा जॉन ब्राऊनला गुलामगिरीची प्रथा संपवण्यासाठी कोणता मार्ग अवलंबायचा आहे हे त्याच्या लक्षात आलं. ब्राऊननं आपल्या साथीदारांबरोबर “हार्पर्स फेरी” या व्हर्जिनियामधल्या सरकारी हत्यारखान्यावर हल्ला केल्याची बातमी काँकॉर्डपर्यंत पोचली. या हल्ल्यामुळे गुलामांमध्ये बंड करण्याचं धैर्य येईल अशी त्याला आशा होती. त्यांना गुलामगिरी बेकायदेशीर असेल असं एक नवीन राज्यही स्थापन करायचं होतं.

पण ब्राऊनची योजना सफल होऊ शकली नाही. अमेरिकन सैन्यानंच ब्राऊनच्या सहकार्‍यांचा पराभव केला. त्यात अनेकजण मारले गेल किंवा पकडले गेले. खुद्द जॉन ब्राऊनला जखमी अवस्थेत पकडून तुरुंगात डांबलं. त्याच्यावर जबरदस्त पहारा बसवला होता.

२ डिसेंबर १८५९ रोजी जॉन ब्राऊनला फाशी झाली. थोरोनं यावर “सरकारनं फक्त ब्राऊनला मारलं आहे, त्याची मोहीम चालूच आहे“ असं लिहिलं होतं. “ब्राऊन आधीच्यापेक्षा आत्ता जास्त जिवंत आहे” असं थोरोनं पुढे म्हणलं होतं. “तो लोकांच्या मनात अजून जिवंतच आहे. तो आता लपूनछपून काम करत नसून दिवसाऊजेडी जनतेमध्ये मुक्तपणे काम करतो आहे.”

१८६० सालापर्यंत गुलामगिरीचा हा वाद देशाला सिव्हिल वॉरकडे घेऊन चालला होता. पण त्यापूर्वी या गुलामगिरीच्या प्रथेविरुध्द आवाज उठवणार्‍या हेत्री थोरोचं या युध्दाच्या बातम्यांकडे अजिबात लक्ष नव्हतं. तो विषमज्वरानं आजारी होता.

आयुष्यभर तो जे करत आला होता तेच त्यानं केलं. तो परत निसर्गाच्या सान्निध्यात जायला लागला. त्याला बरं करण्याची आणि अंगात बळ देण्याची क्षमता निसर्गाकडेच होती.

त्यासाठी त्यानं रात्रीच्या वेळी फेरफटका मारायला सुरुवात केली. त्याला अंधारात दिसणारी दृश्यं आणि ऐकू येणारे आवाज अनुभवायचे होते. त्याला परिचित असलेलं कॉकॉर्ड शहर रात्रीच्या वेळी एकदम अनोखं आणि अनोळखी भासायचं. “तेव्हा रस्ते ओळखण्यासाठी मला रस्त्यांवरची झाडं पहावी लागायची, रस्ता नसेल तिथे पायवाटेवर सावकाशपणे चालत ओळख पटवून घ्यावी लागायची..” असं तो म्हणायचा.

१८६० च्या वसंत ऋतूमध्ये थोरो मिनेसोटाला गेला. तिथली कोरडी हवा फुफुसांमधलं इन्फेक्शन बरं करेल अशी त्याला आशा होती. पण तो कॉंकॉर्डला परत आला तेव्हा त्याची प्रकृती आधीपेक्षा जास्त बिघडलेली होती. “निरोगी होणं काय असतं हे मी विसरुन गेलोय इतका काळ आता मी आजारीच आहे” असं त्यानं याबद्दल लिहिलं होतं.

थोरोनं आपल्या आयुष्याचे अखेरचे काही महिने आपल्या पूर्वजांच्या घरातच काढले. अशक्तपणामुळे जिना चढण्याचीही ताकद त्याच्यात उरली नव्हती. त्याचे मित्र त्याला भेटायला येत होते. हवालदार सॅम स्टेपल्स पण एकदा भेटायला आला होता. “मृत्यूशय्येवरच्या कोणत्याच माणसाला आपण इतकं शांत आणि प्रसन्न पाहिलं नाही” असं नंतर सॅमनं इमर्सनला सांगितलं होतं.

मृत्यूशी झुंजत असताना थोरोला कधीच भीती वाटली नाही. “मी लहान असल्यापासून एक दिवस मला मृत्यू येणार याची मला जाणीव होती. त्यामुळे मला आता निराश वाटत नाही” आपल्या एका मित्रापाशी तो म्हणाला होता.. “मृत्यू माझ्याइतकाच तुझ्याही जवळ आहे..!”

त्याला मित्रांना भेटून बरं वाटायचं. पण शेजारपाजारची लहान मुलं त्याला भेटायला यावीत असं त्याला प्रकर्षानं वाटायचं. “ती मला माझीच मुलं असल्यासारखीच प्रिय वाटतात..” असं त्यानं मान्य केलं होतं.

६ मे १८६२ च्या सकाळी झोपून उठल्यावर थोरोची प्रकृती खूपच वाईट झाली होती. तो मूस, इंडियन असे शब्द कुजबुजत्या स्वरात उच्चारत होता. आपण मेनच्या जंगलात आहोत असे त्याला भास होत असावेत. मग त्यानं डोळे मिटले, ते कायमचेच. थोरो मरण पावला.

त्याला कॉंकॉर्डच्या छोट्याशा कब्रस्तानात दफन केलं. त्याच्या साध्यासुध्या कबरीवर फक्त एकच शब्द होता : हेन्री.

*"चला, आपण या नूतन जगाला नूतनच ठेवू."*

# प्रकरण ८ : जीवनाचा पदन्यास

त्याचा मृत्यू होईपर्यंत हेन्री डेव्हिड थोरो लेखक म्हणून फारसा गाजला नाही. "कॉंकॉर्ड आणि मेरिमाक नद्यांमध्ये एक आठवडा" या पुस्तकाच्या मूठभर प्रती खपल्या होत्या. जास्तीत जास्त दोन हजार लोकांनी "वॉल्डन" हे पुस्तक वाचलं होतं. थोरो जिवंत असताना त्याच्या लेखनाचं महत्व खूप कमी लोकांना ठाऊक होतं.

एकाच व्यक्तीनं थोरोला खरोखर जाणलं होतं, ती व्यक्ती म्हणजे राल्फ वाल्डो इमर्सन. थोरोच्या शवयात्रेच्या वेळी इमर्सननं "हेन्रीची कीर्ती जगभर पसरेल" असं भविष्य वर्तवलं होतं. "आपण एक महान सुपुत्र गमावला आहे याचं देशाला भानच नाही" असं इमर्सन म्हणाला होता.

इमर्सनचं भविष्य तंतोतंत खरं ठरलं. हेन्री मरण पावल्यानंतर काही काळातच "अटलांटिक मासिका"नं त्याचे काही लेख प्रकाशित केले. "वॉल्डन" हे पुस्तक थोड्या काळातच लोकप्रिय झालं. त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. "कॉंकॉर्ड आणि मेरिमाक नद्यांमध्ये एक आठवडा" या पुस्तकाच्याही अनेक आवृत्त्या प्रकाशित झाल्या. १९०६ साली थोरोची डायरी पण प्रकाशित झाली. २० लाखांपेक्षा जास्त शब्दसंख्या असलेल्या या डायर्‍या १४ भागात प्रकाशित झाल्या

"सामाजिक असहकार" या विषयावर त्यानं लिहिलेले लेख तत्कालीन नेत्यांना शांततापूर्ण बदल घडवण्यासाठी प्रेरक ठरले.

ज्या लोकांनी हे लेख वाचले त्यापैकी एक महात्मा गांधीही होते. ज्यांनी इंग्लंडपासून भारत स्वतंत्र व्हावा यासाठी असहकाराच्या आंदोलनाचं नेतृत्व केलं होतं. "थोरोच्या विचारांचा माझ्या आंदोलनावर नि:संदेह प्रभाव होता" असं गांधीजींचं म्हणणं होतं. मार्टिन ल्यूथर किंगनंही हा लेख वाचला. तो वंशभेद आणि अमेरिकेत निग्रो लोकांबाबत होणार्‍या भेदभावावर अहिंसेच्या मार्गानं म्हणजे बहिष्कार, धरणं आणि प्रदर्शनं करुन विरोध करत होता.

पण थोरोच्या ज्या पुस्तकाचा लोकांवर सर्वात जास्त प्रभाव पडला - ते आहे "वॉल्डन". बहुमोल निसर्गाला त्याच्या मूळ रुपात अस्पर्श ठेवून त्याचं मोल जाणून त्याचा आनंद लुटायला हवा हे या पुस्तकानं जगाला शिकवलं.

वॉल्डनच्या एका वाचकानं या पुस्तकाची तुलना एका तळ्याशी केली होती. "थंडावा आणि ताजेपणा देणारं हे पुस्तक आहे" असं त्यानं लिहिलं होतं. दुसर्‍या एका वाचकानं "या पुस्तकाच्या प्रत्येक पानावर नर्मविनोद आणि सखोल विचार असं दोन्ही असल्यामुळे ते परिपूर्ण आहे" असं लिहिलं होतं. ई.बी. व्हाईट या "शार्लोटस वेब" या पुस्तकाच्या लेखकानं "वॉल्डन हे जीवनाच्या पदन्यासात सामील होण्याचं आमंत्रण आहे" असं म्हणलं होतं.

थोरोच्या लेखनानं कित्येक लोकांना जंगलं आणि वन्यजीव यांचं रक्षण करण्याची प्रेरणा दिली आहे. सर्वोच्च न्यायालयाचे न्यायाधीश विल्यम ओ डग्लस यांनी "लोकांना झाडं म्हणजे इमारतीसाठी लाकूड असंच वाटायला लागलं होतं त्या काळात थोरोचा जन्म झाला. झाडांवर वाढणारे पक्षी, त्यांचा किलबिलाट, झाडांमुळे पाण्याचं होणारं रक्षण हे लोकांना तेव्हा दिसेनासं झालं होतं. या संकुचित दृष्टिकोनाला पहिला विरोध करणारा पृथ्वीवरचा रहिवासी थोरो होता" असे उद्गार काढले होते.

जॉन म्युईर यांनी राष्ट्रीय बागबगीचे आणि जंगलं यांच्या संरक्षणाचं काम केलं होतं. थोरोनं शिकवलेल्या विद्यार्थ्यांपैकी ते एक आणि पर्यावरणवादी विचारांचे होते. प्रसिध्द जीवशास्त्र संशोधिका रचेल कार्सन, जिनं जगाला धोकादायक कीटकनाशकांविरोधात पहिल्यांदा इशारा दिला होता, ती आपल्या जवळ कायम थोरोची डायरी बाळगायची.

आजच्या पर्यावरण रक्षणाच्या मोहिमेमागे हेन्री थोरोच्या विचारांचंच बीज आहे. त्या मोहिमेमुळे अमेरिकेत आज लाखो एकर जमीन राष्ट्रीय उद्यानं,  जंगलं आणि वन्यप्राण्यांच्या सुरक्षिततेसाठी जतन केलेली आहे. त्या जमिनीत कारखानदारी किंवा इतर कोणत्याही प्रकारचा दुरुपयोग होणार नाही याची दक्षता घेतलेली आहे. पशुपक्षी यांच्या प्रजाती नष्ट होऊ नयेत यासाठी जगभरात अनेक लोक वन्यप्राण्यांना नैसर्गिक घर मिळावं यासाठी कार्यरत आहेत. कित्येकजण भोवतालचं प्रदूषण कमी करणं आणि नैसर्गिक वातावरणाचं जतन करणं या कामातही सहभागी झालेले आहेत.

मरण पावण्याआधी काही दिवसांपूर्वी थोरोनं लिहिलं होतं.. “प्रत्येक शहरात एक बाग, किंवा खरं तर हजार-पाचशे एकरांमध्ये विखुरलेलं जंगल असायला हवं. त्या जंगलातून सरपणासाठी एकही फांदी तोडली जाता कामा नये. ते निसर्गरम्य ठिकाण प्रत्येकासाठी एक घर असायला हवं. तिथे लोकांचं शिक्षण आणि मनोरंजन दोन्ही व्हायला हवं” हेन्री थोरोनं सगळ्या अमेरिकन नागरिकांना या उद्दिष्टाच्या दिशेनं काम करावं असं आवाहन केलं होतं.

“आपण या नित्यनूतन जगाला तसंच नित्यनूतन ठेवायला हवं” असं तो म्हणायचा. जर एखादा माणूस आपल्या सहकार्‍यांच्या हातात हात घालून चालू शकत नसेल तर तो इतर कोणत्या तरी तालावर चालत असेल हे उघड आहे. दुसर्‍या भाषेत सांगायचं झालं तर, माणसाच्या अंतरात्म्यातला आवाज म्हणजेच तो दुसरा ताल आहे. ते ऐकून एखादी व्यक्ती अनोखं जीवन जगायचा प्रयत्न करत असेल. अशा व्यक्तीनं जगभ्रमण करावं - जसं थोरोच्या चार्ल्स या काकानं केलं होतं. किंवा तिनं थोरोसारखं जंगलात रहायचा प्रयत्न करायला हवा.

थोरोच्या आत्म्यानं त्याला निसर्गाच्या सान्निध्यात एक साधं सुधं जीवन जगण्याची प्रेरणा दिली. चूक बरोबर हे निर्णय घेताना त्यानं प्रत्येकालाच आपला आतला आवाज ऐकायला सांगितलं होतं. त्यानं आपले विचार आणि अनुभव लिहून ठेवायला अनेकांना प्रोत्साहित केलं. त्याच्या मृत्यूनंतरही आजही थोरोच्या शब्दांचा या वसुंधरेला अधिक सुंदर आणि शांततामय बनवण्यात महत्वाचा सहभाग आहे.